श्री ढुंढिराज मास माहात्म्य!

भारतीय कालगणनेकरीता दोन पद्धतींचा उपयोग केला जातो. एकास सौरमास म्हणतात तर दुसरीस चांद्रमास असे म्हणतात. या दोन गणनांमध्ये प्रतिवर्षी सुमारे १३ दिवसांचा फरक पडत जातो. त्यामुळे सुमारे तीन वर्षांनी अशी एक परिस्थिती येते की एका चांद्रमासाच्या काळात सूर्याचे राश्यांतर घडतच नाही. अशा या चांद्रमासास ज्योतिष शास्त्राच्या परिभाषेत अधिकमास असे म्हणतात.

संपूर्ण चांद्रमासात सूर्याचे एकाच राशीत स्थिर असणे या गोष्टीचा स्थिरतेशी संलग्न रुपात विचार करीत या काळातील सगळ्याच सत्कर्मांना स्थैर्य लाभते या भूमिकेतून हा काळ धर्मशास्त्राने व्रतकाल रुपात महत्वाचा मानला आहे.

सध्याच्या काळाच्या विष्णूप्रधान स्वरूपानुसार सर्वच यास 'पुरुषोत्तम मास' असे म्हणतात. या काळात विष्णुस्मरण पुजन रूप विविध पवित्रकार्यांस सर्वच प्राधान्य दिलेले पहावयास मिळते.

गाणपत्य सांप्रदायाच्या भूमिकेतून या महिन्यास 'श्रीढुंढिराज मास' म्हणण्याची पद्धत आहे. भगवान श्री गणेशांच्या ढुंढिराज स्वरूपाची उपासना या काळात विशेष साधन रुपात वर्णिली आहे.

भगवान श्रीगणेशांचा फारसा परिचित नसलेला अवतार आहे श्रीढुंढिराज अवतार श्रीमुदगल पुराणात या अवताराची कथा विस्तृत रुपात आली आहे. या कथेचा गोषवारा पुढील स्वरुपात पाहता येईल.

कधीकाळी या देशात दिवोदास  नामक राजे होऊन गेले. महाराज दिवोदासास राज्य करण्याचा कंटाळा आला म्हणून ते संन्यास घेऊन तपाचरणात रत झाले. पुण्यवान राजा निघून गेल्याने राज्यात पापाचरणाचा प्रभाव वाढला आणि परिणाम रुपात अनावृष्टीचे संकट सातत्यपूर्ण रीतीने जगाला छळू लागले. सातत्याच्या दुष्काळाने जनता हवालदिल झाली आणि त्यांच्या आर्त हाकेने श्रीब्रह्मदेवही व्याकूळ झाले.

तपस्यारत दिवोदासासमोर येऊन त्यांस पुनश्च राज्य स्वीकारण्याची आज्ञा केली. दिवोदासांनी जगपित्याच्या आज्ञेचा तर मान राखला पण अट घातली की माझ्या राज्यात देवतांचा हस्तक्षेप चालणार नाही. त्यांची पूजा अर्चा सुरु राहील पण अधिकार माझाच असेल. श्रीब्रह्मदेवांजवळ होकाराशिवाय पर्याय नव्हता.

दिवोदास पुन्हा राज्य करण्यास सिद्ध झाले. पण त्यांची राजधानी होती महानगरी काशी आणि काशीत अधिकार चालतो श्रीविश्वनाथांचा. आता ब्रह्मदेवांना श्री शंकरांना काशी बाहेर काढणे भाग होते. शेवटी त्यांनी वेगळाच उपाय योजला. विन्ध्यपर्वतावर तपस्यारत मरिचि नामक ऋषींना मोक्षप्रदान करण्याच्या निमित्ताने श्री शंकरांना तेथे नेले आणि मग तेथे सर्व घटनाक्रम सांगून येथेच राहण्याची विनंती केली. श्री शंकरांचा नाईलाज झाला.

मात्र काशीचा विरह काशीश्वरांना सहन होईना. त्यांनी सगळ्या देवतांचे स्मरण केले. देवांनी वेगळाच मुद्दा मांडला. आमचा अधिकारच नसेल तर आम्ही दिवोदास राज्यात कार्यच कशाला करायचे? असे म्हणत एकेक देवता गुप्त झाली. अग्नीने प्रज्वलित होणे सोडले, जलाने, वायुने वाहने बंद केले.

देवतांना वाटले दिवादोस शरण येईल. पण घडले भलतेच. तपोबलयुक्त राजा दिवादोस स्वत:च सगळ्या रुपात नटला.

काय पंचाईत झाली हे पाहण्यासाठी श्रीशंकरांनी एकेका देवतेला काशीत पाठवले. पण आपल्यावाचून काहीच अडत नाही हे पाहिलेल्या त्यांचीच पंचाईत झाली आणि आता परत जाऊन श्रीशंकरांना काय तोंड दाखविणार? म्हणत त्या देवता तिथेच रमल्या. प्रत्येकाच्या अशा जाण्याने श्रीशंकर अधिकच विचलित होत गेले.

सगळयाच देवता गेल्या आणि ख-या अर्थाने एकटया पडलेल्या श्रीशंकरांना अंतिमपर्याय रुपात आठवले 'श्रीगणराज चरण'.

श्रीशंकरांनी कळवळून श्रीगणराज प्रार्थना केली. मी काशीचा निर्माता, मी काशीचा स्वामी, मी काशीचा अधिकारी या सगळ्या भ्रमाचा निरास झालेल्या श्रीशंकरांच्या निर्मल चित्तात श्रीचिंतामणी प्रगट झाले. मग समोरही प्रत्यक्ष रुपात प्रगट झाले.

श्रीशंकरांनी पूजन स्तवन केले आणि काशीवासार्थ प्रार्थना केली. तथास्तु म्हणत भगवान गुप्त झाले.

श्रीशंकरांच्या या कार्यार्थ भगवान श्री गणेशांनी श्रीढुंढिराज अवतार धारण केला. आरंभी ब्राह्मणरूप घेऊन श्रीढुंढिराज काशीनगरीत आले आणि त्यांनी ज्योतिष विद्येचा आधार घेत सकल जणांना आकृष्ट केले. शेवटी त्यांच्या प्रचंड लोकप्रियतेचा विचार करीत राजास त्यांची दाखल घेणे भाग पडले. त्यांना राजदरबारी पाचारण करण्यात आले. महाराज दिवोदासांच्या आदरातिथ्याचा, पूजनाचा स्वीकार करून भगवान श्रीगणेशांनी त्यांना श्रीविश्ववेश्वराचे पुनरागमन, राज्य त्यागाचा आदेश देत दिवोदासांना मुक्ती प्रदान केली. श्रीविश्वनाथांनी काशीत परतताच प्रथम कार्य केले ते श्रीढुंढिराजांची स्थापना. आज हे स्थान आपणास श्रीविश्वनाथ मंदिराच्या पश्चिम प्रवेशद्वाराजवळच दिसते. श्रीढुंढिराज गणेशांना  वंदन केल्यावरच माझ्या दर्शन फलाची प्राप्ती होईल असा नियम श्री विश्वनाथांनीच त्यावेळी घोषित केला.

ज्योतिषशास्त्राच्या आधारे जनतेला आकृष्ट करणारा हा अवतार असल्याने गाणपत्य साम्प्रदायानुसार ज्योतिषशास्त्राची देवता रुपात श्रीढुंढिराजांना वंदन केले जाते. त्या ज्योतिष कालगणनेचा भाग असल्याने या अधिकमासास श्रीढुंढिराज मास म्हटले जाते.

काशीनगरीतून प्रसंग वशात दुरावलेल्या आणि परिणामत: दु:खी झालेल्या श्री शंकरांच्या दु:ख नाशार्थ आणि पुनरपि सुस्थापने करिता झालेल्या या अवताराच्या उपासनेने आपलीही सकल दु:खे दूर होऊन अखंड आनंद भुवन काशीत आपलीही निवास भूमी निश्चित व्हावी आणि तेथूनच आपली स्वानंद लोकाची वाटचाल प्रशस्त व्हावी यासाठी या काळात श्रीढुंढिराज उपासना अधिक फलदायी वर्णिली आहे.

अशा श्रीढुंढिराज मासाच्या सगळयांना हार्दिक शुभकामना

जय गजानन!                    जय गणेश!